**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम**
केंद्र हिश्श्यांतर्गत अनुसूचित जाती उपयोजना या घटकासाठी कव्हरेज व गुणवत्तबाधित / देखभाल दुरुस्ती / शाश्वतता या अंतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने **(लेखाशिर्ष २२१५ ९८४४)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे २०१४/प्र.क्र.८८/पापु-१०
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १९ जानेवारी, २०१५

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र. ५२/पापु-०७, दि.१७ ऑक्टोबर, २०१४

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून अनुसूचित जाती उपयोजना या अंतर्गत प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदाना संदर्भात आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींकरीता विशेष घटक योजना, ०१ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८४४) या नव्याने उघडण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली अंमलबजावणी यंत्रणांना कव्हरेज व गुणवत्तबाधित / देखभाल दुरुस्ती / शाश्वतता या अंतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. आर्थिक वर्ष २०१४-१५ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरीता उपरोक्त घटकांसाठी लेखाशिर्ष २२१५ ९८४४ या खाली रु. ४८.३० कोटी (रुपये अठ्ठेचाळीस कोटी, तीस लाख मात्र ) एवढा निधी सोबत जोडलेल्या विवरण पत्रातील स्तंभ क्र. ३ अनुसार संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे. यापैकी रु. ४३.४७ कोटी एवढी रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना व रु. ४.८३ कोटी एवढी रक्कम भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना विवरणपत्रातील घटक / बाबींसाठी मुक्त करण्यात येत आहे.

**अटी :-**

अ) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात केवळ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत केंद्र शासनाने दिलेल्या सूचनेनुसार ग्रामीण भागातील अनुसूचित जातींचे प्राबल्य असलेल्या (Rural Habitations having majority of / Dominated by SC Population ) भागांमधील नळ पाणी पुरवठा योजनां संदर्भात केंद्र शासनाने व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

ब) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क) वरील अटी/शर्तीची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे ह्याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

ड) शासन परिपत्रक ग्राम विकास विभाग क्र.आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि.५.९.१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व

ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना संबंधित अंमलबजावणी यंत्रणानी या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५ व पापु- २० ला सादर करावे.

इ) या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत.

फ) या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. ४३.४७ कोटी (रु. त्रेचाळीस कोटी व सत्तेचाळीस लाख फक्त) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, (वित्त) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) (श्री. कुदळे) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. सदर निधीतून करण्यात आलेल्या खर्चाची नोंद केंद्र शासनाच्या IMIS या प्रणालीवर घेण्यात येवून ती वेळोवेळी अद्ययावत करण्यात यावी. तसेच BDS प्रणालीवर मुक्त केलेली रक्कम संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी त्वरित संबंधित कोषागारातून काढण्याची कार्यवाही करावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी न वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची राहील.

४. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींकरीता विशेष घटक योजना, ०१ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१४-१५ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**५. " हा शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे ०८/विघयो, दि. १५/१/२०१५ व क्र. २२/व्यय-३, दि. १५/१/२०१५ अनुसार त्या विभागांनी दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे."**

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्रमांक **२०१४१११७११५७२२३५२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.01.19 14:10:12 +05'30'

**(वि.य.गोखले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, कार्यासन विघयो / वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
आयुक्त, सामाजिक न्याय, पुणे
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

वित्तीय नियंत्रक, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
संचालक / सहाय्यक संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४ / १५ / २०/ २३
निवडनस्ती पापु-१० कार्यासन.

## विवरणपत्र

| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. **राग्रापे २०१४/प्र.क्र.८८/पापु-१०**, दिनांक : १९ जानेवारी, २०१५ चे सहपत्र | | | |
|---|---|---|---|
| अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) **(लेखाशिर्ष २२१५ ९८४४)** | | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | घटक / बाब | **वितरीत करण्यात येणारी रक्कम (रु. कोटी)** |
| १ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | कव्हरेज व गुणवत्ताबाधित गावांच्या योजना | **३६.२७** |
| २ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | देखभाल व दुरुस्ती अनुदान | **०७.२०** |
| ३ | भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे | शाश्वतता (Sustenability) | **०४.८३** |
| | **एकूण** | **रु. ४८.३० (रुपये अठ्ठेचाळीस कोटी व तीस लक्ष मात्र)** | |

Gokhale Vidyadhar Y

Digitally signed by Gokhale Vidyadhar Y
DN: CN = Gokhale Vidyadhar Y, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.01.19 14:10:59 +05'30'

(वि.य.गोखले)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन